GR-200408061249390001-120

<u>कोषागारातून आस्थापना अनुदानाची आहरण व वितरणाची अंतरिम पध्दत.</u>

महाराष्ट्र शासन,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन परिपत्रक, क्रमांक-अआर-२००१/प्र.क्र.२६३२/२३,
दिनांक:-३१ मार्च,२००१.

संदर्भ:-(१)ग्राम विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक:-बीजीटी-1000/प्र.क्र.४५८७/२९,
दिनांक:- 1 नोव्हेंबर,2000

(२ ) वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक-कोषाका-1001/प्र.क्र.54/कोषा-४,
दिनांक:- २९ मार्च,2001.

प्रस्तावना:- जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदान कोषागारामार्फत देण्याबद्दल वित्त विभागाने त्यांच्या शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- कोषाका-१००१/प्र.क्र.५४/कोषा-४, दिनांक २९.३.२००१ नुसार दिनांक १ जून,२००१ पर्यंत दोन महिन्याचे लेखा अनुदान उपलब्ध करुन देण्यासाठीची अंतरिम पध्दती निश्चित केली आहे. या अनुषंगाने खालील प्रमाणे सूचना देण्यात येत आहेत-

परिपत्रक

१. जिल्हा परिषद कर्मचा-यांचे सन २००१ च्या माहे मार्चचे वेतन एप्रिल मध्ये अदा करण्यासाठी व माहे एप्रिल सन २००१ चे वेतन मे महिन्यात अदा करण्यासाठी संदर्भांकित क्रमांक (२) मधील शासन निर्णयाप्रमाणे कार्यवाही करण्याची आहे.

२. दोन्ही महिन्यासाठी लागणारा प्रवास भत्ता, आकस्मिक खर्च यासाठी लागणारे अनुदान वरील शासन निर्णयातील पध्दतीनुसार उपलब्ध करुन घ्यावयाचे आहे.

३. सन २००१-२००२ या वर्षाचे दोन महिन्याचे लेखा अनुदान विधीमंडळाने मंजूर केल्यावर प्रशासकीय विभागांनी हे अनुदान, विशेषतः आस्थापना अनुदान, दिनांक ३

एप्रिल,२००१ पर्यंत वितरण करणा-यासाठी त्यांच्या नियंत्रण अधिका-यांना त्वरित कळवणेत यावे.

४. अनुदान नियंत्रण अधिका-यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील जिल्हा परिषदवार अर्थसंकल्पीय तरतुदी लक्षात घेवून प्रथमत: मार्च महिन्याचे वेतन अदा करण्यासाठी अनुदान वितरण मंजूरी आदेश तत्परतेने काढावेत. सदर अनुदान मंजूर आदेशात वेतन, प्रवास भत्ता व कार्यालयीन खर्च, व इतर बाबीं याचाही समावेश असावा.

५. मंजूर आदेशाची प्रत कोषागाराला अग्रेषित करणे आवश्यक असून, त्यावर शाईची स्वाक्षरी करुन एक प्रत कोषागाराला तत्परतेने पोहचेल अशी व्यवस्था करावी. ही कार्यवाही अनुदान वितरण अधिकारी ५ एप्रिल,२००१ पर्यंत पूर्ण करतील.

६. जिल्हा परिषदेच्या विभाग प्रमुखांनी आपल्या अर्थसंकल्पीय नियंत्रण अधिका-यांशी संपर्क साधून मार्च महिन्याच्या वेतनासाठी व एप्रिल महिन्याच्या प्रवास भत्ता, कार्यालयीन खर्च व इतर बाबी यासाठी अनुदान मंजुरीचे आदेश तत्परतेने प्राप्त करुन घ्यावेत. हे आदेश प्राप्त झाल्यावर सत्वर देयक तयार करुन मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांचेकडे सादर करावे. हे करीत असतांना पंचायत समितीवार अर्थसंकल्पीय तरतुदीची विगतवारी मुख्य लेखा व वित्त अधिकारी याना उपलब्ध करुन द्यावी. जिल्हा परिषदेच्या विभाग प्रमुखांची ही जबाबदारी राहील की, अर्थसंकल्पीय मागणीच्या अनुषंगाने जास्तीत जास्त वस्तुनिष्ठ विगतवारी असेल.

७. मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांनी प्रत्येक जिल्हा परिषदेच्या विभाग प्रमुखाकडून प्राप्त झालेल्या अनुदान मंजुरी आदेश संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयामधील पध्दतीनुसार देयकास जोडून कोषागरात सादर करावे. प्रत्येक प्रधान शिर्षासाठी वेगळे देयक करावे. पंचायत समित्यांना वेतन ई. साठी पाठवावयाचे रेमीटन्स बाबतचा निर्णय घेणेसाठी विभाग प्रमुखांनी पंचायत समितीवार केलेली विगतवारी प्रमुख आधार राहील. कांही विभागाचे अनुदान मंजूर आदेश येण्यास कांही कारणाने विलंब लागत असेल तर त्यासाठी इतर प्रधान शिर्षांची देयके सादर करण्याचे थांबवू नये.

८. माहे एप्रिलच्या वेतनासाठी कोषागाराकडे सहायक अनुदानाची देयके दिनांक २५ एप्रिल पर्यंत टाकण्यात यावीत. यासाठी माहे एप्रिलचे अनुदान मंजुरी आदेश त्या आधी प्राप्त होतील याची खबरदारी घ्यावी.

९. माहे एप्रिल महिन्याचा पगार वेळच्यावेळी होण्यासाठी जिल्हा परिषद विभाग प्रमुख, प्रशासकीय विभागाचे अनुदान नियंत्रण अधिकारी, मुख्य लेखा व वित्त अधिकारी व कोषागार अधिकारी या सर्वांनी योग्य ती काळजी घेणे जरुरीचे आहे.

१०. जिल्हा परिषदांकडे नव्याने कांही योजना, तसेच अधिकारी/कर्मचारी आलेले आहेत. ज्या त्या प्रशासकीय विभागांनी जिल्हा परिषदेकडे असलेले मूळ अधिकारी/कर्मचारी व नव्याने हस्तांतरित झालेले कर्मचारी/अधिकारी यांचा आढावा घेवून आहरण व संवितरण अधिकारी १ एप्रिल,२००१ पासून कोण राहतील याबाबत त्यांचे आदेश दिलेले आहेत असे आदेश प्राप्त नसतील तर त्वरित ज्या त्या विभागाशी संपर्क साधून तसे आदेश प्राप्त करुन घ्यावेत.

११. नव्याने हस्तांतरित झालेल्या योजनांच्या तरतुदी, आस्थापना अनुदान, स्थानिक क्षेत्र या सदराखाली मंजूर आहे किंवा कसे याची जिल्हा परिषद विभाग प्रमुखांनी खातरजमा करावी. स्थानिक क्षेत्राऐवजी जर राज्य क्षेत्रामध्ये असे अनुदान समाविष्ठ झाले असेल तर याबाबत राज्य क्षेत्रातील अनुदान नियंत्रण अधिका-यांना या संदर्भात योग्य ती कार्यवाही करणे आवश्यक राहील.

१२. जिल्हा परिषदांकडे नव्याने वर्ग झालेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्याबाबत भविष्य निर्वाह निधीच्या वर्गणीचा प्रश्न उद्‌भवू शकतो. वर्ग-४ च्या बाबत भ.नि.नि. चा हिशोब जिल्हा परिषदांकडे ठेवावयाचा आहे. वर्ग-३ व त्यावरील कर्मचारी/अधिकारी यांच्याबाबत ज्यांची भ.नि.नि. खाती महालेखापालांकडे आहेत त्यांचे भ.नि.नि. ची वर्गणीची प्रपत्रे स्वतंत्रपणे तयार करण्यात यावीत या प्रपत्रांसह गोषवारा तयार करुन ज्या त्या महालेखापालांना सादर करावा. संबंधितांची भ.नि.नि. मध्ये जमा करण्याची रक्कम ही काळजीपूर्वक परिगणना करुन , चलनाने भ. नि. नि. खाते क्रमांक व नांवाच्या यादीसह शासन जमा करावी तसेच त्याची एक प्रत महालेखापालांना सादर करावी. उर्वरित जिल्हा

परिषद कर्मचा-याना ज्यांची भ.नि.नि. खाती जिल्हा परिषदांकडे आहेत त्यांच्याबाबत नेहमीचीच पध्दत चालू ठेवावी.

१३. मुख्य कार्यकारी अधिकारी व मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांनी सर्व प्रधानशिर्षवार तसेच जुन्या व नवीन योजनांच्या संदर्भातही अर्थसंकल्पीय तरतुदींचा आढावा घेवून वस्तुनिष्ठ अहवाल ग्राम विकास विभाग व ज्या त्या प्रशासकीय विभागाकडे पाठविणे अनिवार्य राहील. माहे मार्च,२००१ महिन्याच्या वेतनाचा अहवाल दिनांक २० एप्रिल,२००१ पर्यंत पंचायत समितीवार व प्रधानशिर्षवार झालेल्या खर्चासह व अनुदानामध्ये कांही कमतरता असेल तर त्या अडचणीच्या तपशीलासह अहवाल सादर होण्याची काळजी घ्यावी.

१४. आता शासन निर्णय (१) मध्ये नमूद केल्यानुसार अर्थसंकल्प हा आस्थापना अनुदान व इतर योजना अनुदान या दोन भागामध्ये करण्यांत सुरुवात झाली आहे हे लक्षात घेवून होणा-या खर्चाच्या व जमेच्या नोंदीही दोन भागात असणे उपयुक्त राहणार आहे. तरी नमुना १३ व १४ मध्ये मासिक खर्च व जमेच्या नोंदवह्या या आस्थापना अनुदानासाठी व योजना अनुदानासाठी स्वतंत्र वापराव्यात व याप्रकारे पूर्ण वर्षाचा खर्चही स्वतंत्र दाखविण्यांत यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( चंद्रा अय्यंगार )
सचिव,ग्राम विकास,
महाराष्ट्र शासन.

प्रति.
१.मा. मुख्य सचिव,
२. सर्व मंत्रालयीन विभाग,
३. महालेखापाल, महाराष्ट्र (एक/दोन) (लेखा परिक्षण) मुंबई/नागपूर,
४. महालेखापाल, महाराष्ट्र (एक/दोन) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
५. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
६. उपमुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण विभाग, नवी मुंबई/नाशिक/पुणे/
औरंगाबाद/अमरावती/नागपूर
७. सर्व उपमुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,
८. सर्व विभागीय आयुक्त.